**सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन या संगणक प्रणाली करिता नोडल अधिकारी,राज्य योजना व्यवस्थापक व First Level Agency यांची नेमणूक करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-२०१६/प्र.क्र.१०२/का-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दि. ०९/१०/२०१८

**वाचा:-** १) वित्त विभागाचे अ.शा.पत्र क्र. संकीर्ण -२०१४/प्र.क्र.२९/कोषा-५, दि.१७/१०/२०१६
२) अल्पसंख्यांकविकास विभागाचे पत्र क्र.केंपुयो-२०१६/प्र.क्र.१०२/का-७ दि.१६/१२/२०१६

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या संनियंत्रणाकरीता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली(PFMS Public finance Management Scheme) ची अंमलबजावणी करण्यात येणार आहे. या पुढे केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत/केंद्र सहाय्यीत योजनांचा निधी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन (pfms) प्रणालीव्दारेच वितरीत करण्यात येणार आहे.अल्पसंख्यांक विकास विभागाअंतर्गत अंमलबजावणी करण्यात येणा-या बहुक्षेत्र विकास कार्यक्रम (MsDP) या योजनेची अंमलबजावणी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन (pfms) प्रणालीमार्फत करण्याकरीता नोडल अधिकारी, राज्य योजना व्यवस्थापक (State Scheme Manager), First Level Agency यांच्या नियुक्त्या संदर्भ क्र.२ मधील दि.१६/१२/२०१६ च्या पत्रान्वये करण्यात आल्या आहेत. त्यापैकी श्री.अशोक गायकवाड,अवर सचिव(नोडल अधिकारी) हे सेवानिवृत्त झाले आहेत तसेच श्री.बा.कि.विरोळे,कक्ष अधिकारी (योजना व्यवस्थापक) यांची अल्पसंख्यांक विकास विभागातून बदली झाली आहे. तसेच बहुक्षेत्र विकास कार्यक्रम या योजनेचे पुनर्गठन (Restructuring) करण्यात आले असून सदर योजना "प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ( PMJVK)" या नावाने राबविण्यात येणार आहे. त्यामुळे प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम(PMJVK) या केंद्र पुरस्कृत योजनेची अंमलबजावणी PFMS मार्फत करण्याकरीता नोडल अधिकारी,राज्य योजना व्यवस्थापक, First Level Agency यांची सुधारीत नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

अल्पसंख्यांक विकास विभागामार्फत राबविण्यात येणा-या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) या योजनेची अंमलबजावणी PFMS मार्फत करण्याकरीता खालिल तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे नोडल अधिकारी, राज्य योजना व्यवस्थापक (State Scheme Manager), First Level Agency ची नियुक्ती या शासन निर्णयाव्दारे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नांव व सांकेतांक क्रमांक | नोडल अधिकारी | राज्य योजना व्यवस्थापक | First level Agency |
|---|---|---|---|---|
| १ | बुहुक्षेत्र विकास कार्यक्रम (MsDP) आता केंद्र शासनाने या नावात बदल करुन प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम (PMJVK) (२२३५ ए ५४३) | अवर सचिव, (का-७) | कक्ष अधिकारी, (का-७) | सहाय्यक कक्ष अधिकारी/संशोधन सहाय्यक (का-७) |

**नोडल अधिकारी :** - नोडल अधिकारी हे अल्पसख्यांक विकास विभागाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनेच्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या समन्वयाचे म्हणजेच ऑनलाईन निधी वितरण व खर्च यावर देखरेख ठेवणेचे काम करतील.

**राज्य योजना व्यवस्थापक** :- राज्य योजना व्यवस्थापक यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम हि योजना राबविण्यासाठी राज्यस्तरावर First Level Agency निर्माण करून त्यांचा प्रशासक म्हणून त्यांच्या अधिनस्त असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांची नेमणूक करावयाची आहे.

First Level Agency :- अल्पसख्यांक विकास विभागाच्या निधी वितरणाच्या कार्यप्रणाली नुसार Second Level Agency निर्माण करण्याची जबाबदारी First Level Agency च्या प्रशासकाची राहिल. Second Level Agency चे प्रशासक म्हणून जिल्हास्तरावरील योजना राबविण्यास सक्षम असलेल्या संबंधित जिल्हाधिकारी / संचालक, अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे अशा दर्जाचे अधिकारी राहतील.

अर्थसंकल्प वितरण प्रणाली (Beams) वर सद्यस्थितीत कार्यान्वित असणा-या या योजानांकरीता रोख प्रवाहाच्या (Cash Flow) वितरणाप्रमाणे तिसरी Level Agency घोषीत करण्यापासून पुढील तत्सम कार्यवाही Second Level Agency ने करावी व याचप्रमाणे पुढील Level Agencies घोषित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

ज्या Agency मार्फत लाभार्थ्याच्या बँक खात्यामध्ये प्रत्यक्ष लाभ दिला जाणार आहे अशा अंतिम Level Agency (उदा.आहरण व संवितरण अधिकारी DDO) यांनी त्यांच्या स्तरावर लाभार्थी (Beneficiary) किंवा व्हेंडर यांना प्रदान करण्यासाठी प्रथमत: लाभार्थी किंवा व्हेंडर यांची नोंद करणे आवश्यक राहिल. त्यासाठी त्यांनी त्यांच्या बँक खात्याची PFMS प्रणालीमध्ये नोंदणी करणे आवश्यक राहिल. तसेच, त्यांच्या स्तरावर Maker व Checker यांचे Login-ID तयार करणे आवश्यक राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००९१५२४१४८०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.10.09 15:28:20 +05'30'

**( दि.मा. सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान सचिव, अल्पसख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) जिल्हाधिकारी (एकूण २४)
३) संचालक अल्पसंख्यांक व प्रौढ शिक्षण संचालनालय,पुणे
४) संचालक (लेखा व कोषागारे) मुंबई,
५) सह संचालक (सुधारणा), संचालनालय लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय,मुंबई
६) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (कोषा-४) मंत्रालय, मुंबई
८) सहाय्यक राज्य नोडल अधिकारी, (PFMS)
९) निवड नस्ती (कार्या-७).